"महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना" या योजनांतर्गत वर्ग / समायोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेली १२ अस्थायी पदे सन २०२०-२०२१ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०३.२०/प्र.क्र.७२/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०३ एप्रिल, २०२०

वाचावे :-

१. वित्त विभागाचा शासन निर्णय असंक्र-१००१/ प्र.क्र.२९ /(भाग-६)/ २००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक :- ०१.०७.२००४.
२. वित्त विभागाचा शासन निर्णय असंक्र-१००१/ प्र.क्र.२९ /(भाग-७)/ २००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक ०१.०९.२००४.
३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.असंक/१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक :- ४.१०.२००४.
४. शासन निर्णय महसूल व वनविभाग क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.१९/प्र.क्र.१०३/फ-१ दिनांक १९.०३.२०१९.
५. शासन निर्णय महसूल व वनविभाग क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.१९/प्र.क्र.१०३/फ-१ दिनांक १७.१०.२०१९
६. शासन निर्णय महसूल व वनविभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र. ७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९
७. शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक १२.०२.२०२०
८. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-३/योजनेतर/ प्र.क्र. ६०/२०१९-२०/१७३३, दिनांक :- १८.०२.२०२०.

प्रस्तावना:-

"महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना" या योजनांतर्गत वर्ग / समायोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या १२ पदांना सन २०१९-२०२० मध्ये संदर्भ क्रमांक ४ व ५ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. आता संदर्भ क्रमांक ८ च्या पत्रान्वये मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सबब "महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना" या योजनांतर्गत वर्ग / समायोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या १२ अस्थायी पदांना सन २०२०-२०२१ मध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

३. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक ७ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सबब "महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना" या योजनांतर्गत वर्ग / समायोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या १२ अस्थायी पदांना सन २०२०-२०२१ मध्ये दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सबब "महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना" या योजनांतर्गत वर्ग / समायोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या १२ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६, वनीकरण व वन्य जीवन, ०२, पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण, (००) (१९) महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिरणाची स्थापना (२४०६ A०८७ ) या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय, क्रमांक : असंक्र-१००१/ प्र.क्र.२९ /(भाग-६)/ २००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक ०१.०७.२००४, क्रमांक : असंक्र-१००१/ प्र.क्र.२९ /(भाग-७)/ २००४/ वित्तिय सुधारणा-१, दिनांक ०१.०९.२००४, क्रमांक : असंक/१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दिनांक १२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००४२७११२५५३२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2020.04.27 11:31:41 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर/पश्चिम मुंबई
४. मुख्य वनसंरक्षक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरण, नागपूर
५. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई
६. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

*****

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्यूएलपी ०३.२०/प्र.क्र.७२ /फ-१, दिनांक ०३ एप्रिल, २०२० सोबतचे विवरणपत्र**

**(दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | एकूण अस्थायी पदे |
|---|---|---|
| १ | सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरण (मुख्य वन संरक्षक दर्जा ) | १ |
| २ | विभागीय वन अधिकारी | १ |
| ३ | प्रशासकीय अधिकारी | १ |
| ४ | सहाय्यक वनसंरक्षक | १ |
| ५ | उपवन अभियंता | १ |
| ६ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ |
| ७ | लेखापाल / लेखाधिकारी | २ |
| ८ | लिपीक | २ |
| ९ | वाहन चालक | १ |
| १० | शिपाई | १ |
| | **एकूण पदे** | **१२** |

********